खर्चाच्या मंजूरीच्या आदेशामधील
त्रुटी दूर करण्याबाबत --

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक:मुविनि-१०८६/प्रकरण-३५७/८६/कोष-६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १९ ऑक्टोबर, १९८७.

वाचावे:- [१] महालेखापाल [लेखा परीक्षा] १, मुंबई यांचे पत्र क्रमांक:कौ-आरड[ए] एफ-१०/जीएडी/४ ते १२-८४/१२२०, दिनांक २९ नोव्हेंबर, १९८५.

[२] महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९८५ मधील भाग-३५ आणि परिशिष्ठ-६ मधील नियमातील तरतूद.

## परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, विविध मंत्रालयीन विभागाकडून किंवा विभाग प्रमुखांकडून किंवा प्रादेशीक विभाग प्रमुखांकडून किंवा कार्यालयीन प्रमुखांकडून खर्चाच्या मंजूरीबाबतचे आदेश निर्गमित केले जातात ते अतिशय त्रोटक असतात. आणि त्या आदेशा--मध्ये अत्यावश्यक अशा माहितीचा अभाव असतो. खर्चाच्या मंजूरीबाबतच्या आदेशांतील अशा प्रकारच्या त्रुटीमुळे संबंधित महालेखापालांना/लेखा परीक्षण अधिका-यांना त्या आदेशाच्या संबंधित आवश्यक अशी माहिती मागविण्यासाठी मंजूरी देणा-या प्राधिका--याकडे परत संदर्भ करावा लागतो. आणि अशा संदर्भानाही संबंधित प्राधिका-यांकडून महालेखापालांना/लेखा परीक्षण अधिका-यांना वेळेवर उत्तरे पाठविली जात नाहीत; अशा प्रकारच्या त्रुटीमुळे आणि महालेखापालांनी मागितलेली माहिती त्यांना वेळेवर न मिळाल्या लेखा परीक्षणाच्या कामामध्ये मोठा अडथळा निर्माण होतो.

खर्चाच्या मंजूरीचे आदेश काढणा-या प्राधिका-याने मंजूरी विषयीचे आदेश स्वयंपूर्ण, स्वयंस्पष्ट आणि सर्वसमावेशक असावेत यादृष्टीने अत्यंत दक्षता घेणे अत्यावश्यक आहे. म्हणून, शासन असें आदेश देतें की, मंत्रालयाच्या प्रशासकीय विभागाने/विभाग प्रमुखाने/क्षेत्रीय विभाग प्रमुखाने/कार्यालय प्रमुखाने खर्चाच्या मंजूरी विषयक आदेश निर्गमित करताना खाली नमूद केलेल्या गोष्टींची कटाक्षाने काळजी घ्यावी:-

[१] वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका १९६४/१९७८ अनुसार विविध स्तरावरील अधिका-यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक, तत्संबंधीचा नियम, नियमपुस्तिकेचा भाग, उप विभाग यासंबंधीचा अत्यंत स्पष्ट असा उल्लेख करण्यात यावा.

[२] खर्चाच्या मंजूरीचे आदेश जर मालाच्या खरेदीसंबंधात असतील किंवा दुरुस्तीसंबंधी असतील किंवा काम पूर्ण करण्यासंबंधी असतील वगैरे प्रकरणी त्यासंबंधी विहित केलेल्या पध्दतीनुसार अधिकृत अभिकर्त्यांकडून

कृ.मा.प...

[एजन्ट] खरेदी करण्यात यावयाची आहे किंवा नाही; तसेच त्यासाठी दरपत्रके [कोटेशन] मागविण्यात येणार आहेत किंवा नाहीत; अधिकृत अभिकर्त्यांकडून काम करून घेतले जाणार आहे किंवा नाही यासंबंधीचा स्पष्ट उल्लेख आदेशामध्ये करणे अत्यावशक राहील. त्याप्रमाणे लेखा परीक्षणाच्या दृष्टीने अत्यावश्यक अशा सर्व बाबींचा मंजूरीच्या आदेशामध्ये न चुकता अंतर्भाव करण्यात यावा. आणि निर्गमित होणारे आदेश हे जास्तीत जास्त स्वयंपूर्ण आणि संपूर्ण होतील/रहातील यादृष्टीने मंजूरीचे आदेश काढतांना मंजूरी देणाऱ्या प्राधिकाऱ्याने कटाक्षाने दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

दि. दि. पत्की,
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.